**उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग अधिकारी (तां) गट-ब या पदावर सरळसेवेने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांची पूर्वाश्रमीची सेवा विद्यमान सेवेस जोडून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन शुद्धीपत्रक क्र.आयएसटी-२०१३/१४८/प्र.क्र. २८/ उद्योग-३**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- १४ जुलै, २०१५.**

**संदर्भ** - शासन निर्णय समक्रमांक दिनांक २४.०६.२०१४

**प्रस्तावना** -

उद्योग संचालनालयाकडून दि.१३.०२.२०१३ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने एकूण १३ उद्योग अधिकारी (तां) गट-ब यांच्या विद्यमान सेवा त्यांच्या पूर्वाश्रमीच्या सेवेस जोडून देण्याबाबत शासन निर्णय समक्रमांक दि. २४.०६.२०१४ निर्गमित करण्यात आला. या शासन निर्णयातील परिच्छेद ३ मधील कोष्टकातील अ.क्र. १ वरील श्री.विवेक राठोड यांची पूर्वाश्रमीची सेवा डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील असून, श्री.राठोड यांचा उद्योग अधिकारी (तां) गट-ब पदाचा राजीनामा शासन आदेश दि.१४.१०.२०१४ अन्वये मंजूर करण्यात आला आहे. सदर १३ अधिकाऱ्यांच्या वेतननिश्चिती व रजा इ. लाभांबाबत वित्त विभागाकडून देण्यात आलेल्या अभिप्रायानुसार डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद हे शासकीय विद्यापीठ नसल्याने श्री.विवेक राठोड यांची पूर्वाश्रमीची सेवा त्यांच्या उद्योग अधिकारी (तां) गट-ब या पदावरील तत्कालिन सेवेस जोडून देता येणार नाही.

**शासन शुद्धीपत्रक :**

शासन निर्णय क्र.आयएसटी-२०१३/१४८/प्र.क्र. २८/ उद्योग-३ दि. २४.०६.२०१४ च्या परिच्छेद ३ मधील कोष्टकातील अ.क्र. १ वरील श्री.विवेक राठोड यांचे नाव व संबंधित तपशील वगळण्यात येत आहे.

२. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१४१७१२१०७११० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नावाने,

Rekha Vijay Katam

Digitally signed by Rekha Vijay Katam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rekha Vijay Katam
Date: 2015.07.14 17:13:56 +05'30'

**(रेखा काटम)**
कार्यासन अधिकारी.

**प्रति,**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
५. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे/रायगड/पुणे/कोल्हापूर/सांगली/ उस्मानाबाद/नागपूर,
६. सहायक प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, गोंदीया,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रायगड/पुणे/कोल्हापूर/सांगली/उस्मानाबाद/ गोंदीया/नागपूर,
८. निवडनस्ती (उद्योग-३)